ज्या सामुहिक विकास योजनांचा थेट फायदा गावातील ४०% पेक्षा अधिक असलेल्या अनुसूचीत जाती/जमातीच्या लोकसंख्येला होणार आहे, अशा योजनांसाठी अनुसूचित जाती/जमाती उपयोजनेअंतर्गत त्या प्रमाणात नियतव्यय उपलब्ध करुन घेण्याबबात .

महाराष्ट्र शासन,
नियोजन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : अजाउ २००९/प्र.क्र.६१/का-१४१३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० डिसेंबर, २००९.

**वाचा :**

१) योजना आयोग,नवी दिल्ली यांचे शासन ज्ञापन क्र.M-13054/1/2008-SCSP/TSP, दि.१८/८/२००९ व समक्रमांकाचे दिनांक २६/१०/२००९ चे शुध्दीपत्रक.

**परिपत्रक :-**

अनुसूचीत जाती/ जमाती उपयोजनची आखणी , अमलबजावणी व सनियंत्रण करण्याकरिता योजना आयोगाने दि.३१.१०.२००५ च्या अर्धशासकीय पत्रासोबत मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. यामध्ये ज्या सामुहिक विकास योजनांचा थेट फायदा गावातील अनुसूचीत जाती/जमातीच्या लोकसंख्येला होणार आहे, अशा योजनांसाठी अनुसूचित जाती / जमाती उपयोजनेअंतर्गत त्या प्रमाणात नियतव्यय ठेवण्याबाबत खालीलप्रमाणे सूचना करण्यात आली होती.

"Outlay for area-oriented schemes directly benefiting Scheduled Castes hamlets villeges having **majority of Scheduled Castes population/Tribal hamlets an villeges** may be included in SCP and TSP ."

२. अनुसूचित जाती / जमाती उपयोजनेअंतर्गत सामुहिक विकास योजनांचा अनुसूचित जाती / जमातीच लाभार्थ्यांनां जास्तीत जास्त लाभ देण्याकरिता आणि अधिक्य लोकसंख्या असलेल्या अनुसूचित जाती / जमातीच गावांची व्याप्ती वाढविण्याकरिता अनुसूचीत जाती / जमाती योजनेसंदर्भात यापूर्वी देण्यात आलेल्या उपरोक मार्गदर्शक सूचनेमध्ये योजना आयोगाने संदर्भाधीन शासन ज्ञापन / शुध्दिपत्रकान्वये खालीलप्रमाणे बदल केला आहे.

"Outlay for area-oriented schemes directly benefiting Scheduled Castes hamle and villeges having majority of Scheduled Castes population/Trib hamlets/villeges shall be included in SCSP and TSP " **The word majority o Scheduled Castes population is replaced with " having more than 40 Scheduled Castes and Scheduled Tribe population "**

modi scptsp.lwp

२.	योजना आयोगाच्या उपरोक्त ज्ञापन व शुध्दीपत्रकानुसार सर्व प्रशासकीय विभागांना कळविण्यात येते की,ज्या सामुहिक विकास योजनांचा थेट फायदा गावातील ४०% पेक्षा अधिक असलेल्या अनुसूचीत जाती/जमातीच्या लोकसंख्येला होणार आहे, अशा योजनांसाठी, सन २०१०-११ च्या वार्षिक योजनेत त्या प्रमाणात आदिवासी विकास व सामाजिक न्याय विभागाकडून नियतव्यय उपलब्ध करुन घेण्याची कार्यवाही करण्याच्या सूचना या परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९१२३०१७३७०२००१ असा आहे.

(अं.अ. कारखानीस )
उप सचिव , महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.

निवड नस्ती /का.क्र.१४१३